20140820152257422३

**सन २०१२-१३ मध्ये प्रादेशिक पर्यटन विकास योजनेतंर्गत महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाभार्फत करण्यात येणा-या कामांना प्रशासकिय मान्यता देऊन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय, क्रमांक टीडी एस २०१२/१०/प्र.क्र.५७५/ पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २३ जानेवारी, २०१३.

**शासन निर्णय** : पर्यटनस्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०१२-१३ मध्ये रुपये १९४.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तदतूदीपैकी रुपये ११२४७.२० लाख डिसेंबर, २०१२ अखेर वितरीत केले आहे. उर्वरित रक्कम रुपये ३३०२.८० लाख अवितरीत आहे. सदर अवितरीत रक्कम रुपये ३३०२.८० लाख मधून रुपये १५५२.०० लाख इतकी रक्कम महराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास खालील कामानां प्रशासकी मान्यता देऊन निधी उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र | जिल्हा | कामाचे स्वरुप व ठिकाण | अंदाजित खर्च | पुर्वी वितरीत निधी | सन २०१२-१३ मध्ये वितरीत निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | पुणे | पानशेत येथील पर्यटक निवासाचे नुतणीकरण | ३००.०० | १५०.०० | १५०.०० |
| २ | सातारा | नायगांव, जि. सातारा येथे नविन पर्यटक निवास बांधणे | ५००.०० | २५०.०० | ५०.०० |
| ३ | ठाणे | टिटवाळा येथे नविन पर्यटक निवास उभारणे | ३००.०० | १५०.०० | १५०.०० |
| ४ | सिंधुदुर्ग | सागरेश्वर येथे नविन पर्यटक निवास उभारणे | ३००.०० | १५०.०० | १५०.०० |
| ५ | मुंबई | जिल्हा निहाय बृहत् आराखडा तयार करण्यासाठी लागणारा निधी | ३०.०० | ०.०० | ३०.०० |
| ६ | | बायोडायजेस्टर | १००.०० | ४.०० | ९५.०० |
| ७ | अहमदनगर | शिर्डी येथील पर्यटक निवास श्रेणी वाढ व नुतनीकरण | ३००.०० | १६.०० | १३०.०० |
| ८ | नागपूर | रामटेक येथील पर्यटक स्वागत केंद्र व आर्ट गॅलरी श्रेणवाढ व नुतनीकरण | ५०.०० | १६.०० | ३४.०० |
| ९ | मुंबई | पु.ल.देशपांडे ऍकडमी दादर येथील कार्यालयाचे श्रेणवाढ व नुतनीकरण | २०.०० | ८.०० | १२.०० |
| १० | सिंधुदूर्ग | सिंधुदूर्ग जिल्हातील सी.-वर्ल्ड प्रकल्प सल्लागार | १०००.०० | १६.०० | ५००.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | नेमणूक व प्रकल्प अहवाल तयार करणे | | | |
| ११ | अहमदनगर | हिवरे बाजार, जि. अहमदनगर ग्रामीण पर्यटन केंद्र विकसित करण | १००.०० | ४.०० | ४६.०० |
| १२ | नाशिक | नाशिक येथील प्रादेशिक कार्यालयाचे नुतनीकरण | ६३.०० | ०.०० | ५.०० |
| १३ | | **राजगड किल्ला परिसर विकास कामांना निधी मंजूर करणेबाबत (महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने किल्ले मालिकेतील प्रस्तावाच्या अनुषंगाने निधीची मागणी केली आहे.)** | ४८७.०० | ०.०० | २००.०० |
| | १ | किल्यांवर चढण्यासाठी सोयीस्कर पायवाटा | | | |
| | २ | विश्रांमस्थाने | | | |
| | ३ | स्वच्छतागृहे | | | |
| | ४ | उपहारगृहे | | | |
| | ५ | माहिती केंद्र | | | |
| | ६ | दिशा दर्शक फलक | | | |
| | | **एकूण राजगड किल्ला** | **४८७.००** | **०.००** | **२००.००** |
| | | **एकूण** | **३५५०.००** | **७६४.००** | **१५५२.००** |

प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०१२-१३ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रुपये १९४.०० कोटी एवढया तरतूदीतून वर तक्त्यात नमूद करण्यात आलेली रक्कम रुपये १५५२.०० लाख (रुपये पंधरा कोटी बावण लाख फक्त) इतकी रक्कम महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास या शासन निर्णयाअन्वये अदा करण्यास शासन खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देत आहे -

**अटी व शर्ती :**

१. वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३. मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च मार्च २०१३ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४. अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

५. तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

६. रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

७. योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

८. सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

९. सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

१०. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०१२-१३ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष "मागणी **क्रमांक झेड्डी-४, ३४५२-पर्यटन, ०१ - पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२)**

**(१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत) सहाय्यक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री. आ.बा. डमाळे, कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. किशोर कुलकर्णी, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानाची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांना वितरीत करावयाची कार्यवाही करावी.

११. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने तपशिलवार प्रस्ताव अंदाजपत्रके व नकाशे सादर करावीत.

१२. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सल्ल्याने व सहमतीने नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १३८/१४४४ दिनांक. ३१/१२/२०१२ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ५/ व्यय-१४, दिनांक १५/०१/२०१३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

आ.बा.डमाळे

**(आ.बा.डमाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.